# '24 ऑक्टोबर' हा दिवस 'मराठा आरमार दिन' म्हणून साजरा करूयात .........

भारतीय आरमाराचे जनक म्हणून **छत्रपती शिवाजी महाराज** यांना ओळखले जाते. शिवरायांच्या पूर्वीही हजारो वर्षांपासून आपल्याकडे आरमार होते. मात्र त्यानंतर काही कारणांमुळे भारतात आरमाराचा वापर पूर्णपणे बंद झाला. एवढेच काय तर समुद्र उल्लंघायला देखील बंदी करण्यात आली. याचा फायदा पोर्तुगीज-इंग्रज-डच-फ्रेंच-सिद्दी यांनी उठविला आणि आपल्याला अनेक वर्षे गुलामगिरीत काढावी लागली. त्यावेळचे बलाढ्य सम्राट मोगल-आदिलशाह-निजामशहा-कुतुबशाह इ. यांनीदेखील प्रबळ असे लढाऊ आरमार उभारण्याचा साधा विचारही केला नाही.

मात्र शिवाजी महाराजांनी कोकणाचा मुलुख ताब्यात आल्यानंतर तेथील समुद्र पाहून, सिद्दी व युरोपियनांच्या उचापती पाहून लढाऊ आरमार उभे केले. एवढेच नाही तर अत्यंत कमी कालावधीत उत्तमोत्तम सागरी किल्ले बांधले. धार्मिक चालीरीती झुगारून देऊन आपल्या मावळ्यांना बलाढ्य युरोपियनांविरुद्ध लढण्याची नवी प्रेरणा दिली. आणि... आणि मग पुढच्या पिढीने आपल्या समुद्रावरील युरोपियनांची सत्ता खिळखिळी करून टाकली. पोर्तुगीज तर स्वतःला हिंदी महासागराचे मालकच समजत. समुद्रामध्ये बाहेर पडणाऱ्या कोणत्याही जहाजांना मग ते बलाढ्य मोगलांचे असले तरी त्यांना पोर्तुगीजांकडून कार्ताझ (परवाने) विकत घ्यावे लागत. मोगलांची हि स्थिती तर आपली काय ? त्यावेळच्या सागरी किनारपट्टीवरील बलाढ्य शाहयांपुढे मराठयांची नव्याने उदयास आलेली सत्ता अगदीच छोटी होती. मात्र शिवरायांच्या दूरदृष्टीमुळे त्यांनी आरमाराची गरज ओळखली.

शिवरायांच्या आरमारासंबंधी एक कवी म्हणतो -

**“देशी भार्गव क्षेत्र सागर तिरी नाना स्थळे योजिनी ।**
**बंदी दुर्ग अनेक डोंगर शिरी बेटे बाले पाहुनी ।**
**जहाजे आरमार भर जलधि दुष्टांसी शिक्षा करी ।**
**बारा मावळ देश पर्वत दरी बांधोनि किल्ले गिरी ॥”**

हा झाला आपला इतिहास, मात्र आपण तो कदापी विसरता कामा नये.

याबाबत इतिहासाचा धांडोळा घेतल्यास पुढील माहिती नजरेत येते -

शिवाजी महाराजांनी इ.स. 1656 मध्ये जावळी काबीज केली. जावळीचे चंद्रराव मोरे यांच्या मुलुखाचा काही भाग कोकणात असल्याने जावळी काबीज केल्यावर शिवाजी महाराजांचा कोकणात प्रवेश झाला. या मुलुखातील समुद्री किनाऱ्यालगतच्या गावांमध्ये राहणाऱ्या लोकांना

सिद्दीकडून होणाऱ्या अन्यायाच्या असंख्य तक्रारी महाराजांच्या कानी आल्या. त्यामुळे मराठ्यांच्या जंजिरेकर सिद्दीशी अनेक झटापटी सुरु झाल्या.

दुसऱ्या अली आदिलशहाने अफझलखानाची शिवाजी महाराजांविरुद्ध नेमणूक करताना जे उद्गार काढले आहेत तो काही भाग 'शिवभारतात' आलेला आहे, त्यातील उल्लेखावरून मुहम्मद आदिलशहाने शिवाजी महाराजांचा वेळीच बंदोबस्त न केल्याने सिद्दी व शिवाजीचा संघर्ष होत असल्याचे म्हटले आहे. यावरून मुहम्मद आदिलशहाचा मृत्यू होण्यापूर्वी सिद्दी व शिवाजी महाराजांच्या सैन्याचा संघर्ष होत असला पाहिजे. मुहम्मद आदिलशहाचा मृत्यू 4 नोव्हेंबर 1956 रोजी झालेला आहे. त्यावरून असेच दिसते कि, 4 नोव्हेंबर 1656 पूर्वी मराठ्यांच्या सिद्दीशी अनेक झटापटी झाल्या. शिवापूर दप्तरातील यादी व जेधे शकावली मधील नोंदीनुसार **श्रावण शुक्ल 1 (म्हणजेच 31 जुलै 1657)** मध्ये रघुनाथपंत राजपुरीस गेले. या नोंदीनुसार असे दिसते कि, **"शिवाजी महाराजांचा कोणी रघुनाथपंत म्हणूस व्यक्ती सिद्दी विरुद्धच्या मोहिमेकरिता दंडाराजपुरीला गेला."** या नोंदी जुलै 1657 च्या आहेत. त्याचप्रमाणे शिवाजी महाराजांच्या विरोधात मोहिमेसाठी अफझलखान वाईला आल्यानंतर त्याने महाराजांना एक पत्र पाठविले असून त्यातील काही भाग शिवभारतात देखील आलेला आहे. यात अफझलखान महाराजांना सांगत आहे कि, **"सतत भाग्यशाली असलेल्या राजपुरीच्या धन्याचा मुलुख तुम्ही हस्तगत केल्याने तो वेढला आहे. त्यामुळे राजपुरीचा राजा जळफळत आहे."** यावरून आपल्याला सिद्दीच्या व मराठ्यांच्या चालू असलेल्या संघर्षाची कल्पना येऊ शकेल.

सिद्दीकडे प्रबळ आरमार असल्यामुळे तसेच वेळोवेळी पोर्तुगीज-आदिलशाही-मोगल सिद्दीच्या मदतीला जात असल्याने त्याच्यावर अंकुश ठेवणे शक्य होत नव्हते. सिद्दीला आपण जमिनीवर मत देऊ शकतो. मात्र समुद्रावर नाही, हे महाराजांना यातून कळून आले. सिद्दीचे सैनिक मराठ्यांच्या ताब्यातील गावे लुटून जात, जाळपोळ करीत, नुकसान करीत. मराठे येत आहेत हे पाहताच सिद्दीचे सैनिक आपल्या जहाजांमध्ये बसून आपल्या समुद्री किल्ला 'जंजिरा' येथे पळून जात. सिद्दीचा आर्थिक नाकेबंदी व रसद तोडावी म्हटले तर समुद्रमार्गे ती गुपचूत आपल्याच शत्रूंकुस विली जाई. बखरीत याबाबत सुंदर वर्णन केलेले आहे, **'घरात जसा उंदीर तसा जंजिऱ्यात लपून बसलेला राजपुरीचा सिद्दी.'** यास कैसे जेर करावे म्हणून महाराजांनी **'आरमार अवश्यमेव करण्याचे, पाणियातील म्हणजे केवळ जंजिरे असे करून गाद जाहाजे मेळवून दर्यास पालाण (घोड्याच्या पाठीवर घातलेल्या खोगिरामुळे जसा घोडा काबूत राहतो तसाच बेटावरील समुद्री किल्ले बांधून, उत्तमोत्तम जहाजबांधणी करून राजांनी समुद्र आपल्या काबूत आणला)** घालण्याचे राजांनी ठरविले'.

**ऑक्टोबर 1657 ते जानेवारी 1658** या कालावधीत शिवरायांनी 100 किमी. लांबीचा समुद्रकिनारा व मुलुख मिळविला. जेधे शकावलीत उल्लेख केलेल्या एका नोंदीनुसार **'अश्विन शु. 7 (म्हणजेच 3 ऑक्टोबर 1657) मध्ये महाराज कल्याणकडे गड पाहावयास गेले'** असा उल्लेख आढळतो. याचा अर्थ महाराजांनी ऑक्टोबर 1657 पूर्वीच कल्याणच्या खाडी दरम्यानच्या वैशिष्ट्यपूर्ण भागाची माहिती आपल्या हेरांकडून घेतलेली असावी. त्यावेळी

कल्याण शहराचा व परिसराचा ताबा आदिलशहाकडे होता. इ.स. 1657 च्या दरम्यान अदिलशाहीमध्ये माजलेल्या बंडाळीचा फायदा शिवाजी महाराजांनी उचलायचे ठरविले. आणि शिवरायांनी **दादाजी बापूजी रांझेकर यांना 'कल्याण काबीज करा' व सखू लोहोकाऱ्यांना 'भिवंडी जिंकून घ्या'** असा हुकूम दिला.

आणि अखेर तो दिवस उजाडला..... **दि. 24 ऑक्टोबर 1657** रोजी ऐन दिवाळीत (वसूबारस) मराठ्यांनी कल्याण, भिवंडी काबीज केली. मिळविलेल्या या नव्या मुलुखाच्या संरक्षणासाठी व सिद्दीच्या कुरापती थांबविण्यासाठी व त्याला समुद्रमार्गे मिळणारी रसद तोडण्यासाठी नाविक दल (लढाऊ आरमार) असणे गरजेचे होते. त्यासाठी योग्य अशी जागा / तळ असणे गरजेचे होते. ऐन समुद्रामध्ये नौका बांधता येत नाहीत. लष्करीदृष्ट्या समुद्रामधून आत घुसलेली खाडी हि जहाजबांधणीसाठी उत्तम जागा असते. आणि कल्याणच्या या खाडीत मराठ्यांच्याच नव्हे तर भारताच्या पहिल्या जहाजाची निर्मिती झाली. यावर्षी या घटनेस 359 वर्षे पूर्ण झालेली आहेत. हि आपल्यासाठी अत्यंत अभिमानास्पद बाब आहे. या मराठ्यांच्या जहाजबांधणीच्या गोदीच्या संरक्षणासाठी महाराजांनी कल्याणच्या खाडीजवळ असणाऱ्या टेकाडावर **'दुर्गाडीचा किल्ला'** बांधला.

याबाबत जेधे करीन्यात पुढीलप्रमाणे वर्णन आलेले आहे. **"शके 1579 हमलंबी सवंछरीं (इ.स.1657) कल्याण भिवंडी फिरंगीयावरी मोहीम केली. .......... कल्याण भिवंडी घेतली. फिरंगणात स्वाऱ्या घालून मुलुख लुटीला. अखेरी किल्ला वसविला. ....... कल्याणाजवळ बंदरी दुर्गाडीचा कोट बांधला. तेसमयी राजश्री (शिवाजी) स्वामीस कल्याणांत हरजिनस मत्ता व द्रव्य सापडले. फत्ते जाहली. ........ कल्याण भिवंडी प्रांत किल्ले देखील कबज जाले. राजश्री (शिवाजी) स्वामी कल्याणास आले. चौकसी करून आबाजी महादेव कल्याणात देखरेखीस ठेविले.**

यावर कवी 'यशवंत' म्हणतात -
**“ दाभोळ, भिवंडी, मारुनिया कल्याण**
**सागरा घातले राजांनी पालाण**
**हल्लाही चढविला दंडाराजपुरीला**
**लाविला सिद्दीच्या नवीन घोर जिवाला**
**घेतले जिंकुनी तळे आणि घोसाळे**
**हर्षाने सागर अधिकाधिक फेसाळे**
**तारवे लागली डोलू सागरपृष्टी**
**गड जेवी झळकती डोंगरमाथ्यावरती**
**अंगार झोंबला विजापुरी दर्बारा**
**बैसला फिरंगी लोकांनाही दरारा. ”**

अशा शुभमुहूर्तावर शिवरायांनी आरमाराची उभारणी केली, म्हणून **'24 ऑक्टोबर'** हा दिवस **'मराठा आरमार दिन'** म्हणून आपण सर्वजण मोठ्या उत्साहात साजरा केला पाहिजे.

त्यादिवशी दरवर्षी 'दुर्गाडीच्या किल्ल्याजवळ' जमून अथवा प्रत्येकाला जेथे शक्य असेल त्या किल्यावर, इतिहास प्रसिद्ध ठिकाणाजवळ जमून 'मराठा आरमार दिन' साजरा करावा. किल्यांच्या फोटोंचे प्रदर्शन, मर्दानी खेळांचे सादरीकरण, व्याख्यानांचे आयोजन करून संरक्षणाच्या दृष्टीने आरमाराचे महत्त्व व प्रतिकूल परिस्थितीमध्ये शिवाजी महाराजांनी उभारलेले आरमाराचे महत्त्व सर्वांना पटवून द्यावे.

**चला तर मग ....... '24 ऑक्टोबर' हा दिवस 'मराठा आरमार दिन' म्हणून आपण सर्वजण मोठ्या उत्साहात साजरा करूयात .......**

#मराठा_आरमार_दिन

**- अनिकेत अंकुश यादव**
४१७, शुक्रवार पेठ, शिवाजी रोड, पुणे ४११००२.
Email – aniketyadav84@gmail.com

---

This article has been published in Daily News paper **'Lokmat'** Pune on dated 23 October 2016.